# महाराष्ट्र शासन

महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळ - स्थापन करण्याबाबत

महाराष्ट्र शासन
सामाजिक न्याय,सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग,
शासन निर्णय क्र.इडीडी-२००१/प्र.क्र.६५/सुधार-३
मंत्रालय विस्तार भवन,मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २१ नोव्हेंबर, २००१

**शासन निर्णय :** अपंगांच्या सामाजिक विकासासाठी आर्थिक विकास महामंडळ स्थापन करावे अशी सततची मागणी होत होती. ही बाब व त्या संदर्भातील केंद्र शासनाच्या सूचना लक्षात घेऊन राज्यात अपंगासाठी विकास महामंडळ स्थापन करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्याबाबत आता विचार होवून शासनाने राज्यात "महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळ" स्थापन करण्याचा निर्णय घेतला आहे. महामंडळाचा उद्देश व भागभांडवल खालीलप्रमाणे राहील.

२. महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळ हा शासनाचा उपक्रम म्हणून कंपनी अधिनियम १९५६ खाली नोंदणीकृत करण्यात येईल. तथापि, ही एक फक्त कर्ज देणारी संस्था राहणार नसून ती अपंगांसाठी विकास व प्रोत्साहनात्मक कार्य करणारी संस्था असेल व त्यांच्या आर्थिक उन्नतीच्या योजना राबविण्याचे कार्य करील.

३. महामंडळाचे संचालक मंडळ खालीलप्रमाणे राहील व त्याची मुदत ३ वर्षे राहील:-

| | |
|---|---|
| १)मा. मंत्री, समाजकल्याण | अध्यक्ष |
| २)मा.राज्यमंत्री, समाजकल्याण | उपाध्यक्ष |
| ३)सचिव,सामाजिक न्याय | सदस्य |
| ४)व्यवस्थापकीय संचालक,एन.एच.एफ.डी.सी किंवा त्यांचा प्रतिनिधी | सदस्य |
| ५)आयुक्त( अपंग व्यक्ती समान हक्क कायदा) | सदस्य |
| ६) ते ९) ४ अशासकीय सदस्य (ज्यांची निवड राज्यशासनामार्फत करण्यात येईल. हे सदस्य अपंग क्षेत्रातील संघटनांशी संबंधित असतील. यामध्ये अंध, मूकबधिर,अस्थिव्यंग व मतिमंद या अपंगाच्या संवर्गातील किमान १ सदस्य असावा.) | सदस्य |
| १०)महामंडळाचे व्यवस्थापकीय संचालक | सदस्य-सचिव |

४. महामंडळाचे अधिकृत भागभांडवल रु.५० कोटी राहील. चालू आर्थिक वर्षात रु.२०.०० लाख (रु.वीस लाख फक्त) एवढे भागभांडवल अंशदान मंजूर करण्यास मान्यता देण्यात येत आहे. यामधून संस्थापन नियमावली तयार करणे, त्यांचे छपाई करुन कंपनी निबंधकाकडे नोंदणी करणे, नोंदणी शुल्क अदा करणे, संचालक मंडळाची बैठक आयोजित करुन मंडळाच्या योजनांना मंजूरी देणे, फर्निचर,जोडण्या,संगणक,दूरध्वनि व इतर प्राथमिक स्वरुपाचा अत्यावश्यक भांडवली खर्च भागविण्यात यावा.

५. सदर महामंडळाला प्रतिवर्षी उपलब्ध होणा-या योजनांतर्गत तरतुदीतून भागभांडवल अंशदान मंजूर करण्यात येईल.

६. केंद्र शासनाच्या राष्ट्रीय विकलांग वित्तीय महामंडळाकरिता रु.१० कोटी एवढी शासकीय हमी प्रकल्पाची उचलक्षमता विचारात घेऊन मंजूर करण्यात येईल.

७. महामंडळाचे नोंदणीकृत कार्यालय मुंबई येथे राहील.

८. महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळाच्या आस्थापनेवर मुख्यालयासाठी खालील पदे निर्माण करण्यास शासन मंजूरी देत आहे:-

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | व्यवस्थापकीय संचालक(उपसचिव दर्जाचे) | १२०००-३७५-१६५०० | १ |
| २ | जनरल मॅनेजर(अवर सचिव दर्जाचे) | १००००-३२५-१५२०० | ४ |
| ३ | सहायक(इंग्रजी,मराठी टंकलेखन व संगणक जाणणारे) | ४५००-१२५-७००० | ३ |
| ४ | शिपाई | २५५०-५५-२६६०-६०-३२०० | १ |
| ५ | वाहनचालक | ३०५०-७५-३९५०-८०-४५९० | १ |
| | | एकूण | १० |

वरील पदनिर्मितीकरिता उच्चस्तर सचिव समितीची मान्यता घेण्यात येईल.

जिल्हा स्तरावरील कामकाज सध्याच्या महामंडळामार्फत पाहण्यात यावे.

९. यावरील खर्च "४२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण यावरील भांडवली खर्च ,०२ समाजकल्याण,१९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूक, (०२) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना,राज्य योजनांतर्गत योजना,(०२)(०१) महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (४२३५-०१८-२) मागणी क्र.एन १० अे" या अर्थशिर्षाखाली येत्या विधानमंडळ अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे करण्यात येणाऱ्या तरतूदीमधून भागविण्यात यावा व त्याखाली खर्ची टाकण्यात यावा.

१०. हा शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभागाच्या सहमतीने वित्त विभागाचा अनो.संदर्भ क्र.९७९/०२/व्यय-१४,दि.१७.१२.२००२ व क्र.६८५/०२/साक्र, दि.१९.१२.२००२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

(सु.बि.सावळे)
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रति,
राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
मंत्री(समाजकल्याण) यांचे खाजगी सचिव
राज्यमंत्री(समाजकल्याण) यांचे खाजगी सचिव
राज्यमंत्री,माहिती व जनसंपर्क यांचे स्वीय सहायक
इतर सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक
सर्व मंत्रालयीन विभाग
महालेखापाल,महाराष्ट्र-१,मुंबई.
अधिदान व लेखाधिकारी,मुंबई

निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई
नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई
वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,मंत्रालय,मुंबई
व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळ,मुंबई
व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्ग वित्तीय व मागासवर्गीय महामंडळ मर्या.,मुंबई
व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र चर्मोद्योग विकास महामंडळ मर्यादित,मुंबई
व्यवस्थापकीय संचालक,महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ मर्यादित,मुंबई
व्यवस्थापकीय संचालक,लोकशाहीर अण्णाभाऊ साठे विकास महामंडळ मर्यादित,मुंबई
व्यवस्थापकीय संचालक,वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ,मुंबई
संचालक,समाजकल्याण,महाराष्ट्र राज्य,पुणे
मुख्य कार्यकारी अधिकारी,महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ,१९/२१,मनोहरदास स्ट्रीट,फोर्ट,मुंबई
सचिव,भारत सरकार,गृह मंत्रालय,नवी दिल्ली(पत्राने)
सर्व राज्याचे मुख्य सचिव(पत्राने)
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी
सर्व विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी
सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी
निवड नस्ती,का.सुधार-३